महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय
मंजूरी देण्यात आलेल्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण
योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.
मंगळवेढा नगर परिषद, जि. सोलापूर

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१४/प्र.क्र.३४४/पापु.२२**
गोकुळदास तेजपाल हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २६ डिसेंबर, २०१८

वाचा :

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८**
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८**
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ २०१२/प्र.क्र.५३६/पापु-२२, दि.८.१०.२०१२**
४) **कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे १ यांचे पत्र क्र.तांशा/पुणे/२४११/२०१२, दि.५.१२.२०१२.**
५) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१२/अनुदान/प्र.क्र.६८०/पापु-२२, दि.१९.१२.२०१२.**
६) **मुख्याधिकारी, मंगळवेढा नगरपरिषद यांचे क्र.मनप/पापु/कार्या-३/०९५/२०१८, दिनांक १०.०१.२०१८चे पत्र.**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ०८.१०.२०१२ अन्वये मंगळवेढा शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.५८.४० लक्ष किंमतीच्या सुधारणा कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.५२.५६ लक्ष अनुदान अनुज्ञेय असुन मंगळवेढा नगर परिषदेच्या स्वहिश्श्याची रक्कम रु.५.८४ लक्ष आहे. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये मंगळवेढा शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.५४,२३,६००/- इतक्या किंमतीच्या सुधारणा कामाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिली आहे. मंगळवेढा नगर परिषदेने स्वहिश्श्याची संपूर्ण रक्कम रु.५.८४ लक्ष संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असुन शासन निर्णय, दि.१९.१२.२०१२ अन्वये रुपये १८.०० लक्ष अनुदान मंगळवेढा नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, मंगळवेढा नगरपरिषद यांनी रु.१८.५८ लक्ष रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून सदर योजनेंतर्गत उर्वरित अनुदान वितरीत

करण्याची विनंती केली आहे. मुख्याधिकारी, मंगळवेढा नगरपरिषद यांनी सदर योजनेंतर्गत मंजूर सुधारणा कामे ९७.५०% पुर्ण झाली असल्याबाबतचा भौतिक प्रगती अहवाल सादर केला आहे. तसेच सदर योजनेचे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने पडताळणी केलेल्या अहवालाची प्रत सादर केली आहे. मुख्याधिकारी, मंगळवेढा नगर परिषद यांनी दिनांक १६.०१.२०१४ च्या कार्यादेशाद्वारे संबंधित ठेकेदारास रु.४७,३३,१९०/- कार्यादेश दिले आहेत. उप विभागीय अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, उपविभाग, पंढरपूर यांनी सदर योजनेवर होणाऱ्या खर्चाचे Overall Excess/Saving Statement सादर केले असुन त्यामध्ये सदर योजनेवरील खर्चामध्ये रुपये ६१,३९५/- इतकी संभाव्य बचत होणार असल्याचे नमूद आहे. सदर बचतीची रक्कम योजनेच्या किंमतीमधून वजा केल्यास योजनेची सुधारीत किंमत रु.५७,७८,६०५/- इतकी येत आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.५२,००,७४४/- इतके अनुदान अनुज्ञेय आहे. सदर योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी रु.२५,३२,१७८/- इतके अनुदान मंगळवेढा नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ०८.१०.२०१२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या मंगळवेढा शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित कामांकरिता अनुज्ञेय अनुदानापैकी रु.२५,३२,१७८/- ( रुपये पंचवीस लाख बत्तीस हजार एकशे अठ्ठयाहत्तर फक्त ) पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

( रक्कम रुपयांत )

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| मंगळवेढा | ५७,७८,६०५ | ५२,००,७४४ | ५,७७,८६१ | ५,८४,००० | १८,००,००० | २५,३२,१७८ |
| | | | | | **एकुण रुपये** | **२५,३२,१७८** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२६१०५९५७२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahendra B Hajari

Digitally signed by Mahendra B Hajari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2a611aa6775332ae4fb220e8dd3ec11f80d6b95fec14b729156665cff860b06b, serialNumber=4d2c04ec5ad8ef37ec32a9360d83d2731bb0d44617af98bbd8b8b0fbdbc2a914, cn=Mahendra B Hajari
Date: 2018.12.26 12:49:03 +05'30'

(म. बा. हजारी)

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
- जिल्हाधिकारी, सोलापूर
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे १.
- जिल्हा प्रकल्प अधिकारी ( नगरपालिका ), जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर
- जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
- उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई
- मुख्याधिकारी, मंगळवेढा नगर परिषद, जि.सोलापूर
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४, पापु-०५, पापु.२०, पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.